**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील सहायक संचालक, गट-अ या पदावर पदोन्नती देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

शासन आदेश क्रमांक : इएसई-२०१४/प्र.क्र.१८७/प्रशा-२
मंत्रालय (मुख्य इमारत), दालन क्र.२०४, २ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०००३२
दिनांक : ०४ जानेवारी, २०१७

**शासन आदेश :-**

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील " कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी", गट-ब या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना "सहायक संचालक", गट-अ (वेतनश्रेणी वेतन बँड रु.९३००-३४८००, ग्रेड वेतन रु.५०००/-) या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांचे नावासमोर स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे.

| अनु. क्र. | कौ.वि.,रो.व उ. मा. अधिका-यांचे नाव व जात प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | सध्याचे कार्यालय | पदोन्नतीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. सं. पां. चाटे (भ.ज.ड) | खुला | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, नाशिक |
| २ | श्री.दि.गं.कुंभार (राजे) (इ.मा.व.) | खुला | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, ठाणे | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, सोलापूर |

२. सदर पदोन्नतीचे आदेश तात्काळ अंमलात येत आहेत.

३. वरील अधिकाऱ्यांची सहायक संचालक, गट-अ या पदावरील पदोन्नती ही खालील विहित अटी व शर्तींच्या अधीन असेल :-

१. उपरोक्त अधिकारी हे ज्या दिवशी पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिवसापासून त्यांना पदोन्नती विषयक लाभ अनुज्ञेय होतील.
२. उपरोक्त अधिकाऱ्यांची जात वैधता प्रमाणपत्रे शासनास प्राप्त झाली आहेत. सदर जात वैधता प्रमाणपत्रामध्ये काही तांत्रिक मुद्यांची पुर्तता करणेचे अधीन राहून वैधता प्रमाणपत्र दिल्याबाबतचा उल्लेख नमूद असेल तर त्या तांत्रिक मुद्यांची पुर्तता तात्काळ करणे संबधित अधिकाऱ्यांवर बंधनकारक असेल.

३. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०२/०६/२०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार वरील अधिकाऱ्यांनी मत्ता व दायित्वाचे विवरणपत्र सादर केले असल्याची खात्री आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांनी करावी .
४. उपरोक्त पदोन्नत्या ह्या तात्पुरत्या स्वरुपात असून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन तसेच, मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक २७९७/२०१५ च्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.
५. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दिनांक २८ एप्रिल, २०१५ व दिनांक १६ जुलै, २०१५ अन्वये महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५ नुसार उपरोक्त पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांना वाटप करण्यात आलेल्या महसुली विभागीय संवर्गात ३ वर्षे सेवा करणे आवश्यक राहिल.
६. सदर आदेश संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध कोणतीही विभागीय चौकशी प्रलंबित/प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई यांनी उपरोक्त आदेशाची विनाविलंब अंमलबजावणी करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०१०४१५२५१००४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2017.01.04 15:29:28 +05'30'

**( ब. शे. मांडवे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
५. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई
६. संबंधित उपसंचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. संबंधित अधिकारी (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयामार्फत)
१०.निवड नस्ती.